S - 20040719123440001 - 2500

एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत
पर्यवेक्षिकांची पदे भरण्याबाबत --

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक एबावि २००१/ प्र क्र १४६/ का ६
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- २ जानेवारी, २००२

**वाचा** - १. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक एबावि २००१/ प्र क्र १४६/ का ६, दिनांक १७ नोव्हेंबर, २००१.
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक एबावि २००१/ प्र क्र १४६/ का ६, दिनांक ७ डिसेंबर, २००१.

**निर्णय** - एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या पर्यवेक्षिकांच्या (मुख्य सेविका) एकूण पदापैकी २५% पदे अर्हता प्राप्त (मॅट्रीक्युलेट) व १० वर्षे मानधनी सेवा झालेल्या अंगणवाडी सेविकांमधून भरण्याबाबत तसेच त्यासंदर्भात अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबतचे आदेश, शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक एबावि २००१/ प्र क्र १४६/ का ६ , दिनांक १७ नोव्हेंबर, २००१ अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयातील परिच्छेद १(१) अन्वये निर्गमित केलेल्या २५% पदसंख्येच्या आदेशांमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत :-

(१) परिच्छेद १(१) - एकात्मिक बाल विकास सेवा योजनेच्या सर्व प्रकल्पांमधील पर्यवेक्षिकांच्या एकूण मंजूर पदांपैकी ५०% पदे माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा (यामध्ये शासनाने या परीक्षेस समकक्ष म्हणून घोषित केलेल्या इतर परीक्षा अंतर्भूत आहेत.) उत्तीर्ण असलेल्या व १० वर्षे मानधनी सेवा झालेल्या अंगणवाडी सेविकांमधून भरण्यास शासन मान्यता देत आहे.

(२) वर नमूद केलेल्या दिनांक १७.११.२००१ आणि दिनांक ७.१२.२००१ च्या शासन निर्णयात ज्या ज्या ठिकाणी २५% पदांचा उल्लेख करण्यात आला आहे, त्या सर्व ठिकाणी २५% ऐवजी ५०% पदे समजण्यात यावीत.

२. तसेच वर नमूद दिनांक १७.११.२००१ च्या शासन निर्णयाच्या परिच्छेद २(३) मध्ये उमेदवारांच्या पात्रतेबाबत (अ)(ब)नंतर (क) म्हणून खालील उप परिच्छेद समाविष्ठ करण्यात येत आहे :-

(क) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक एबावि १०९९/ प्र क्र ५४८/ का ६, दिनांक ३१.८.१९९९ मधील सुचनांनुसार तसेच सदर शासन निर्णयात नमूद केलेल्या शासन निर्णयांव्दारे वेळोवेळी दिलेल्या आदेशांनुसार ज्या बालवाडी सेविका/शिक्षिका/मदतनीस यांना अंगणवाडी सेविका म्हणून सामावून घेतले आहे अशा अंगणवाडी सेविकांच्या १० वर्षाच्या अनुभवासाठी त्यांनी बालवाडी सेविका / शिक्षिका/ मदतनीस म्हणून केलेली सेवाही विचारात घेण्यात यावी. यामध्ये एकात्मिक क्षेत्र विकास कार्यक्रम रत्नागिरी व सिंधुदुर्ग या कार्यक्रमातील ज्या बालवाडी सेविकांना अंगणवाडी सेविका म्हणून सामावून घेतले आहे, त्यांनी बालवाडी सेविका / शिक्षिका म्हणून केलेली सेवाही विचारात घेण्यात यावी.

3. पर्यवेक्षिकेच्या पदांवरील नियुक्तीसाठी अंगणवाडी सेविकांची वयोमर्यादा 55 व्या वर्षापर्यंत वाढविण्यात आली असली तरीही सेवानिवृत्ती विषयक लाभ मिळण्यासाठी आवश्यक असलेल्या किमान सेवेची अट कोणत्याही परिस्थितीत शिथिल करण्यात येणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ग. गो. पंचभाई)
शासनाचे उप सचिव

प्रति,
मा.मंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय,मुंबई.
मा. राज्य मंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय,मुंबई.
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई.
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई.
नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, मंत्रालय,मुंबई.
आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,कोकण भवन,नवी मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त, महानगर पालिका (सर्व)
मुख्य अधिकारी, नगरपालिका (सर्व)
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
महालेखापाल, महाराष्ट्र १ /२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
उप संचालक, सआयो, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
सह संचालक, सआयो तथा विभागीय अधिकारी, महिलाव बाल विकास, मुंबई
बाल विकास प्रकल्प अधिकारी (ज्येष्ठतम) तथा विभागीय अधिकारी, महिला व बाल विकास, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद, अमरावती विभाग
विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
सर्व जिल्हा धिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण / ग्राम पंचायत) जिल्हा परिषद
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
सर्व समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी
सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक
उप सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक
महिला व बाल विकास विभाग, (कार्यासन ५)
निवड नस्ती (कार्यासन- ६)